**महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय व सहकार न्यायालये, मुंबई यांच्या रेकॉर्डचे स्कॅनिंग व डिजिटायझेशन बाबतच्या प्रस्तावास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१८/प्र.क्र.७६/२२-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- १९ सप्टेंबर, २०१८.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय, मुंबई व सहकार न्यायालये, मुंबई यांचे रेकॉर्डचे स्कॅनिंग व डिजिटायझेशन बाबतच्या रु. २,९५,७५,०००/- च्या खर्चास प्रशासकीय मंजूरी देण्याबाबतचा प्रस्ताव अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय, मुंबई यांनी सादर केला आहे. सदर खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय, मुंबई यांनी महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय, मुंबई व सहकार न्यायालये, मुंबई यांच्या रेकॉर्डचे स्कॅनिंग व डिजिटायझेशन करीता रु. २,९५,७५,०००/- (रुपये दोन कोटी पंच्याण्णव लक्ष पंच्याहत्तर हजार फक्त ) इतक्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मंजूरी देण्याची विनंती केली आहे.

महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय, मुंबई व सहकार न्यायालये, मुंबई यांचे रेकॉर्डचे स्कॅनिंग व डिजिटायझेशन करीतात रु. २,९५,७५,०००/- (रुपये दोन कोटी पंच्याण्णव लक्ष पंच्याहत्तर हजार फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

दि. ४.०५.२०१८ च्या आदेशान्वये मा. उच्च न्यायालयाने सहकारी अपिल न्यायालये व सहकार न्यायालये यांच्या अभिलेखांचे स्कॅनिंग व डिजिटायझेशन करण्यासाठी आवश्यक अनुदानाचा प्रस्ताव राज्य शासनास पाठविण्याचे निदेश अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय, मुंबई यांना दिले. त्यानुसार प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागास जुलै, २०१८ च्या पावसाळी अधिवेशनात अभिलेखांचे स्कॅनिंग व डिजीटायझेशन यांच्यासाठी रु. ३ कोटीची पुरवणी मागणी मंजूर करण्यात आली आहे. सदर प्रक्रीया करतानाच नेमकी किती पाने स्कॅन करावयाची आहेत, हे तज्ज्ञांच्या मार्गदर्शनाखाली निश्चित करण्यात यावे. प्रस्तावामध्ये टॅगिंग, रिट्रायाव्हल व इंडेक्सींगचा समावेश असावा. सदर उद्देशासाठी सल्लागाराची नियुक्ती करावी व ई-निविदा प्रक्रीया राबवावी, निविदा प्रारुपावर माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाचे अभिप्राय घ्यावेत.

मागणी क्र. व्ही-२,
मुख्य/गौण/उपशिर्ष २४२५, सहकार,००१-संचालन व प्रशासन
(०१) (०९) महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय (२४२५ ०१०२)
(योजनेतर) (दत्तमत)
१३-कार्यालयीन खर्च

सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग (मातं) च्या अनौपचारिक संदर्भ क्र.२३०१/मातं(२९), दि. २३.०७.२०१८, वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र. ४१०/व्यय-२, दि. ३०.०८.२०१८ व अनौपचारिक संदर्भ क्र. ४६८/विनियम, दि. १.०९.२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या बेवसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१८०९१९१५५८५४३२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Deepak S Desai

Digitally signed by Deepak S Desai
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMT Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d11b2ee4dfa01facc6e58028a3bde93d4ac81d87ed6247ca0fb3a827602426f, cn=Deepak S Desai
Date: 2018.09.19 16:04:13 +05'30'

**(दि. शि. देसाई)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
२. मा. राज्यमंत्री, (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय, मुंबई,
५. निबंधक, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय, मुंबई,
६. अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई,
७. महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
८. उपसचिव, कार्यासन (५-स) व (१२-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, ३९(मातं), मंत्रालय, मुंबई,
१०. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-२) व ( विनियम), मंत्रालय, मुंबई,
११. अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. निवड नस्ती (२२-स).